**महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणामार्फत फुटकळ भूखंडांचे वाटप करण्यापूर्वी शासनाची मान्यता घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: वाटप-२०१७/प्र.क्र.६५/गृनिभू,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- १४ जुलै, २०१७

**शासन परिपत्रक:-**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास (जमिनीचे वाटप) विनियम, १९८२ मधील विनिमय १६ अंतर्गत शासन स्तरावरुन, म्हाडाच्या निवासी/ अनिवासी भूखंडाच्या वितरणाकरीता शासनास प्राप्त झालेल्या अधिकाराचा वापर करण्यासाठी मा.मंत्री, गृहनिर्माण यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळाची उप समिती शासन निर्णय, दि. १ एप्रिल, २०१७ अन्वये गठीत करण्यात आली आहे.

म्हाडाच्या सध्या अस्तित्वात असलेल्या जुन्या वसाहतींमधील सहकारी गृहनिर्माण संस्थांना पुनर्बांधणीसाठी विक्री करावयाचे उर्वरित चटईक्षेत्र, फुटकळ भूखंड, ना फुटकळ ना स्वतंत्रपणे विकास योग्य भूखंड, करमणूकीचे मैदान इत्यादींच्या वाटप व किंमतीचे सुधारित धोरण म्हाडा प्राधिकरणाचा ठराव क्र.६२६०, दिनांक ४.६.२००७ अन्वये जाहीर केले आहे.

सदरहू ठरावानुसार याबाबतची कार्यवाही शासनाच्या मान्यतेशिवाय, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाच्या स्तरावरच परस्पर करण्यात येते. सबब, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास अधिनियम, १९७६ च्या कलम १६४ (१) मधील तरतूदीनुसार शासनास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, **पुढीलप्रमाणे निदेश/ सूचना देण्यात येत आहेत:-**

**महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाचा ठराव क्र.६२६०, दिनांक ४.६.२००७ अन्वये, फुटकळ भूखंडाचे (Tit-Bit) वाटप प्राधिकरण स्तरावरुन परस्पर न करता, यापुढे या सर्व भूखंडांचे वाटप करण्याचे प्रस्ताव शासन निर्णय दि.१.४.२०१७ अन्वये गठीत केलेल्या मंत्रिमंडळ उप समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यासाठी शासनास सादर करण्यात यावेत.**

२. सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०७१४१७२८०५०७०९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

M.U.Bharose

Digitally signed by M.U.Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f3abf3ab8b16dfec487f18ce64d6b0ab8e38d8925d44d15f7dbd61babb4ae6df, cn=M.U.Bharose
Date: 2017.07.14 17:25:32 +05'30'

**( मुं.उ.भरोसे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत :-**

१) मा.मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

२) मा. मंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०००३२
३) मा.मंत्री, शालेय शिक्षण, क्रीडा आणि युवक कल्याण, उच्च व तंत्रशिक्षण, मराठी भाषा, सांस्कृतिक कार्य, अल्पसंख्यांक विकास व वक्फ यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४) मा.राज्यमंत्री, गृहनिर्माण, उच्च व तंत्र शिक्षण, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५) मा.राज्यमंत्री, नगर विकास, गृह (शहरे), विधी व न्याय, संसदीय कार्य, कौशल्य विकास आणि उद्योजकता, माजी सैनिकांचे कल्याण, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
६) मा.अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
७) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१
८) सर्व मुख्य अधिकारी, मुंबई/कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळे
९) गृहनिर्माण विभागातील सह/उप सचिव व सर्व अवर सचिव व सर्व कक्ष अधिकारी.
१०) निवडनस्ती, गृनिभू कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

*******